**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२२-२३ पासून संस्था बंद करण्यास शासन मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२३/प्र.क्र.५९/तांशि-४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २६ जुलै, २०२३.

**वाचा :-** १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र एफ क्र. वेस्टर्न/१-१०९६८९१००९८/२०२२/कंप्लिट क्लोजर, दि.१३.०२.२०२३.
२) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/एनजीसी/मान्यता/२०२३/४७९, दि.३०.०५.२०२३.

**प्रस्तावना :** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी त्यांच्या वर नमूद क्र.१ येथील दि.१३.०२.२०२३ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच संचालक, तंत्र शिक्षण यांनी वर नमूद क्र.२ येथील दि.३०.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार डॉ.डी.वाय.पाटील स्कूल ऑफ बिझनेस मॅनेजमेंट, वरळे, पुणे ही व्यावसायिक अभ्यासक्रमाची संस्था शैक्षणिक वर्ष २०२२-२३ पासून बंद करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन व संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे शैक्षणिक वर्ष २०२२-२३ पासून डॉ.डी.वाय.पाटील स्कूल ऑफ बिझनेस मॅनेजमेंट, वरळे, पुणे ही व्यावसायिक अभ्यासक्रमाची संस्था बंद करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) सदर संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्तऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्रे, विद्यार्थ्यांचे पत्ते, फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने संबंधित विद्यापीठाकडे सुपूर्द करणे आवश्यक राहील.

२) संस्थेतील संबंधीत अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांच्या पर्यायी व्यवस्थेबाबत तसेच सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेल्या सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील .

३) भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

४) संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापि थकीत असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

५) संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

६) सदर संस्था टप्प्याटप्प्याने बंद करताना त्या संस्थेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना अभ्यासक्रम पूर्ण होईपर्यंत शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देण्याची व परिक्षेस बसण्याची व्यवस्था करण्याची जबाबदारी संस्था घेईल. संस्थेने या शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन न दिल्यास, संस्थेविरुध्द नियमानुसार कारवाई करण्यात येईल व शासनाकडे ठेवलेली संचित ठेव शासन जमा करण्यात येईल.

७) संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना नियमानुसार देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानांचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७२५१६०५४७४२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN JYOTINATH GHIRATKAR

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=21524D9E84E57776BA1EE448660F3699BDD08917801A19974A72D568F57F5401, cn=NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2023.07.26 12:03:45 +05'30'

**( नि.ज्यो.घिरटकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, अमरावती.
३) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे.
५) संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.
७) सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
८) विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.
९) निवड नस्ती/तांशि-४.